**“महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)” अंतर्गत संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला या उद्योग समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाचे दुस-या टप्प्यातील पात्र अनुदानापैकी उर्वरीत वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२२/ प्र.क्र.७९/ उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक २७/०३/२०२४

**संदर्भ:-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०१३/ प्र.क्र.२०७/ उद्योग-७, दिनांक २५/०२/२०१४.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एमएसई-२०१९/ प्र.क्र.९३/ उद्योग-७, दिनांक २४/०७/२०१९.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२०२०/ प्र.क्र.११९/ उद्योग-७, दिनांक २६/०३/२०२१.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२२/ प्र.क्र.७९/ उद्योग-७, दिनांक ३०/०३/२०२२.
५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२२/ प्र.क्र.७९/ उद्योग-७, दिनांक ३१/०३/२०२३.
६) अधिक्षकीय उद्योग अधिकारी (औसशा), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ औसशा/ एमएसआयसीडीपी/ CFC/ अनुदान वितरण/ २०२४/ अे-३४५, दिनांक २२/०३/२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यातील औद्योगिकदृष्ट्या अविकसित क्षेत्रातील छोट्या समूहांचा समूह विकास होऊन त्याद्वारे सूक्ष्म व लघु घटकांच्या सर्वांगीण विकासास चालना मिळणेसाठी “महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)” ही योजना दिनांक २५/०२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत सूक्ष्म व लघु उपक्रमाच्या सर्वांगिण विकास व वाढीकरीता क्षमतावृध्दी कार्यक्रम अंमलबजावणीसाठी तसेच सामायिक सुविधा उभारणीसाठी राज्य शासनाचे अनुदान देण्यात येते.

२. MSICDP योजनेंतर्गत औद्योगिक समूहाच्या उत्पादन प्रक्रियेमधील त्रूटी, कमतरता यांचे योग्य निदान करून अद्ययावत तंत्रज्ञान, बाजारपेठ विस्तारीकरण, विविध यशस्वी औद्योगिक समूहांना भेटी, अद्ययावत प्रशिक्षण कार्यक्रम व अभ्यास दौरे इत्यादीचा समावेश असलेला निदानोपयोगी अभ्यास अहवाल (DSR) तयार करण्यात येतो. सदर निदानोपयोगी अभ्यास अहवाल जिल्हास्तरीय समितीच्या शिफारशीनंतर प्राप्त झाल्यानंतर राज्यस्तरीय औद्योगिक समूह संनियंत्रण समितीमार्फत निदानोपयोगी अभ्यास अहवाल प्रस्तावास मंजूरी देणे व त्याअंतर्गत क्षमतावृध्दी कार्यक्रमास अनुदान निश्चिती करणे

इत्यादी बाबी केल्या जातात. तसेच सूक्ष्म व लघु उद्योग घटकांची उत्पादकता व स्पर्धात्मकता वाढविणेसाठी उच्च दर्जाच्या सामायिक सुविधा व इतर आवश्यक परवाने, ना-हरकत दाखले, तांत्रिक व आर्थिक मूल्यांकन अहवाल यांचा समावेश असलेला सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करण्यात येतो. सामायिक सुविधा केंद्राच्या सदर प्रस्तावास राज्यस्तरीय सुकाणू समितीची अंतिम मंजूरी मिळाल्यानंतर खरेदी प्रक्रिया सुरू करण्यात येते.

३. MSICDP योजनेच्या दिनांक २४/०७/२०१९ रोजीच्या सुधारीत मार्गदर्शक तत्त्वांनुसार राज्यस्तरीय सुकाणु समितीद्वारे सामायिक सुविधा केंद्राच्या प्रस्तावास अंतिम मंजूरी मिळाल्यानंतर विभागीय समिती मार्फत खरेदी प्रक्रिया पूर्ण झालेल्या प्रकल्पांना खरेदी तपशिलासह अहवाल प्राप्त झाल्यानंतर प्रथम टप्प्यातील २०% अनुदान वितरीत केले जाते. तद्नंतर महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र यांचेकडून प्रकल्प मंजूरीप्रमाणे यंत्रसामुग्री, उपकरणे कार्यस्थळावर सुस्थापित झाल्याबाबतचा भौतिक पडताळणी अहवाल प्राप्त झाल्यानंतर व प्रथम टप्प्यातील अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर दुसऱ्या टप्प्यातील ६०% अनुदान वितरीत केले जाते. उर्वरीत २०% अनुदान हे सामायिक सुविधा केंद्र यशस्वीपणे पूर्ण झाल्याबाबतचे संबंधित उद्योग सह संचालक यांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर वितरीत केले जाते.

४. संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला या औद्योगिक समूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्यस्तरीय सुकाणू समितीने दिनांक ०२/११/२०२१ रोजी संपन्न १४ व्या बैठकीत रुपये १०,१०,५२,०००/- इतक्या प्रकल्प किमतीस अंतिम मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार सदर प्रकल्पास राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये ९,०९,४७,०००/- इतके मंजूर असून ६०% प्रमाणे रुपये ५,४५,६८,२००/- इतकी रक्कम दुस-या टप्प्यांतर्गत वितरणास पात्र आहे. त्यापैकी दुस-या टप्प्यांतर्गत रुपये ३,५७,५५,४४०/- इतका निधी दिनांक ३१/०३/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये अंशत: वितरीत करण्यात आलेला आहे. दुस-या टप्प्यातील पात्र उर्वरीत अनुदान रुपये १,८८,१२,७६०/- वितरीत करण्याबाबत उद्योग संचालनालयाकडून दिनांक २२/०३/२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित करण्यात आलेले आहे.

५. संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला या औद्योगिक समूह प्रकल्पाच्या CFC उभारणींतर्गत विभागीय समितीमार्फत निश्चित केलेल्या रुपये ९,०९,००,०००/- इतक्या रकमेच्या यंत्रसामुग्रीपैकी रुपये ७,८९,००,०००/- इतक्या रकमेची यंत्रसामुग्री कार्यस्थळावर सुस्थापित झाल्याबाबतचा भौतिक पडताळणी अहवाल तसेच प्रथम टप्प्यातील वितरीत तसेच दुस-या टप्प्यातील अंशत: वितरीत राज्य शासन सहभाग अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग सह संचालक, अमरावती यांनी उद्योग संचालनालयामार्फत सादर केलेले आहे. उद्योग संचालनालयाच्या दिनांक २२/०३/२०२४ रोजीच्या प्रस्तावानुसार सदर प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाच्या हिश्श्यातील दुस-

या टप्प्यातील पात्र अनुदानापैकी उर्वरीत अनुदान रुपये १,८८,१२,७६०/- वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्य शासनाच्या "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (MSICDP)" या योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला या प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी राज्य शासनाच्या हिश्श्यातील दुस-या टप्प्यातील पात्र अनुदानापैकी उर्वरीत अनुदान रुपये १,८८,१२,७६०/- वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव उद्योग संचालनालयाने उपरोक्त संदर्भ क्र. ६ येथील पत्रान्वये सादर केलेला आहे. त्यानुषंगाने प्रस्तुत योजनेतील तरतूदीनुसार राज्य शासनाच्या हिश्श्यातील दुस-या टप्प्यातील पात्र अनुदानापैकी उर्वरीत अनुदान रुपये १,८८,१२,७६०/- (अक्षरी रुपये एक कोटी अठ्ठ्याऐंशी लक्ष बारा हजार सातशे साठ फक्त) इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी रुपये १,८८,१२,७६०/- ही रक्कम शासकीय कोषागारातून काढून संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला या प्रकल्पाच्या M/s Sangha Textile Development Association जि. अकोला या विशेष हेतू वाहन संस्थेला देण्याची व्यवस्था करावी. उपरोक्त नमूद रुपये १,८८,१२,७६०/- ही रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ व त्यासोबतचे परिशिष्ठामध्ये नमूद तरतूदी तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

i. "महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम" या योजनेचा शासन निर्णय दिनांक २५/०२/२०१४ रोजी निर्गमित केला असून त्यामध्ये योजनेचा कालावधी, अंमलबजावणी यंत्रणा, अनुदान वितरण, विविध मंजूरीस्तव समिती यांची माहिती दिलेली आहे.

ii. सदर योजनेंतर्गत यापूर्वी वितरीत ९०% पेक्षा जास्त अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आले आहेत. तसेच संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला या प्रकल्पास यापूर्वी वितरीत केलेला १००% निधी विहित कामांसाठी विनियोजित झाला असून वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

iii. सदर प्रकल्पास यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाबाबत लेखा परिक्षकांकडून कोणतेही आक्षेप उपस्थित करण्यात आलेले नाहीत.

iv. निधी मंजूरीप्राप्त प्रकल्पाच्या प्राधिकृत बँक खात्यामध्ये थेट जमा होणार आहे.

४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर समूह प्रकल्पाच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय भागभांडवलाच्या सुयोग्य वापरावर व विनियोगावर देखरेख ठेवण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

५. सदर योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, ०० १०२ लघुउद्योग-राज्य योजनांतर्गत योजना (००) (२४) महाराष्ट्र राज्य औद्योगिक समूह विकास कार्यक्रम (एमएसआयसीडीपी) (२८५१ ६३७८) ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ मधील परिच्छेद ३ व त्यासोबतच्या परिशिष्टामधील अटींची पूर्तता होत असल्याने तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०५/०२/२०२४ व दिनांक ०४/०३/२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार आणि वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.०१/२०२४/व्यय-१६, दिनांक ०९/०१/२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३२७१६३९५००८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2024.03.27 16:49:04 +05'30'

**( राजीव राजमाने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (पाच प्रती)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
६) उद्योग सह संचालक, अमरावती विभाग. (उद्योग संचालनालयामार्फत)
७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, अकोला. (उद्योग संचालनालयामार्फत)
८) संघा टेक्स्टाईल क्लस्टर जि. अकोला. (उद्योग संचालनालयामार्फत)
९) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) अवर सचिव (कार्यासन प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती (उद्योग-७).